**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी प्रभादेवी, मुंबई व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील नुतनीकरणाच्या कामामध्ये अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुड्स लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीता झालेल्या खर्चाच्या अंदाजपत्रकास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२५/प्र.क्र.१९१(६)/सां.का.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**वाचा :-** १. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे पत्र जा.क्र. पुलदे/आस्था/२०२५/ ११७, दि. ३१.०१.२०२५.
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. पुलदे-२०२५/प्र.क्र.३३/सां.का. २ दि. १३.०३.२०२५

**प्रस्तावना :**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील नुतनीकरणाच्या कामामध्ये अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुड लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीता रुपये ४,४२,६३,९१०/- इतक्या रकमेच्या सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त झालेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये केली होती. त्यानुषंगाने सदरहू प्रस्तावास विहीत अटींच्या अधीन राहून उपरोक्त संदर्भ क्र. २ शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रयोजनार्थ वित्त विभागाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात आला असल्याकारणाने सदरहू प्रस्तावास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी प्रभादेवी, मुंबई व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील नुतनीकरणाच्या कामामध्ये अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुड लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीता झालेलया रु.४,४२,६३,९१०/- इतक्या रकमेस सदरहू शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरचा निधी ठेव अंशदान निधी म्हणून सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०६) (२२०५ ३७३३), ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०३.** सदर प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता लेखाधिकारी, पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक, पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या रकमेची देयके संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा (VPDA) द्वारे आहरित करण्यासाठी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करुन विहित प्रणालीद्वारे संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच मधील अ.क्र. १ मधील नियम क्र. १३४ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३३११८३९३०८५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 18:40:23 +05'30'

**(बाळासाहेब ई. सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर.
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई.